**महाराष्ट्र राज्यातील, माजी सैनिकांचे पुनर्वसन व अन्य कल्याणकारी कार्यक्रम राबविण्यासाठी, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाच्या (मेस्को), व्यवस्थापकीय संचालक पदाच्या सेवाशर्ती व अन्य अटी शर्ती निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१९४ /२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०२/११/२०१८.

<u>वाचा-</u>

१) शासन निर्णय सा.प्र.वि.क्र : मासैम १०९९/२३९०/प्र.क्र.२४४/९९/२८, दिनांक १८ जानेवारी, २००२.
२) शासन निर्णय, सा.प्र.वि.क्रमांक : मासैम-२०१६/प्र.क्र१९४/१६/२८, दिनांक १९ मार्च, २०१८

<u>शासन निर्णय-</u>

महाराष्ट्र राज्यातील माजी सैनिकांचे पुनर्वसन व अन्य कल्याणकारी कार्यक्रम राबविण्यासाठी, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : मासैम-१०९९/२३९०/प्र.क्र.२४४/९९/२८, दिनांक १८ जानेवारी, २००२ अन्वये, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मेस्को) या महामंडळाची स्थापना करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील निर्णय क्रमांक ३ नुसार, सदर महामंडळाच्या संचालकांचे काम, संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे हे 'अतिरिक्त कार्यभार' म्हणून पाहतील असाही शासनाने निर्णय घेतलेला होता. मेस्को महामंडळाच्या कामकाजाची वाढलेली व्याप्ती बघता, सदर महामंडळाच्या व्यवस्थापकीय संचालक पदी स्वतंत्र अधिकारी नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार संदर्भाधीन दिनांक १९ मार्च, २०१८ च्या शासन निर्णयान्वये, मेस्को महामंडळाच्या व्यवस्थापकीय संचालक पदासाठी स्वतंत्र अधिकारी नियुक्त करण्याचा शासनाने निर्णय घेतलेला आहे. मेस्को महामंडळाच्या संचालकपदी नियमित व्यवस्थापकीय संचालकांची नियुक्ती करणे, सेवाशर्ती, निलंबन, इ.बाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील असे संदर्भाधीन शासन निर्णय क्र. २ मध्ये नमूद केलेले आहे. त्याअनुषंगाने मेस्को महामंडळाच्या, व्यवस्थापकीय संचालक पदी नियुक्ती करणे, सेवाशर्ती, निलंबन इ.बाबतच्या तरतूदी खालीलप्रमाणे आहेत.

२. मेस्को महामंडळाच्या, व्यवस्थापकीय संचालक पदी स्वतंत्र अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यासाठी शासनस्तरावर खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

१) प्रधान सचिव व वि.चौ.अ.(१), सा.प्र.वि.मंत्रालय, मुंबई - अध्यक्ष
२) एअर व्हाईस मार्शल श्री.एम.डब्ल्यू.देसाई, वित्तीय सल्लागार, गुंतवणूक समिती, सैनिक कल्याण विभाग, पुणे - सदस्य
३) मेस्को महामंडळाच्या संचालक मंडळामधील संचालक - सदस्य

४) उप सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई - सदस्य

५) उप सचिव (मासैक/कार्या.२८), सा.प्र.वि.मंत्रालय, मुंबई. - सदस्य सचिव

३. मेस्को महामंडळावर संचालक पदासाठी सेवाशर्ती खालीलप्रमाणे असतील.

१) महाराष्ट्र राज्याचे अधिवासी असलेले व ५५ वर्षापेक्षा अधिक वयाचे नसलेले सेवानिवृत्त माजी सैनिक,

२) भारतीय सेनेतील ब्रिगेडीयर पेक्षा कमी श्रेणीचे नसलेले भूदलामधील अधिकारी किंवा नौदल अथवा वायुसेनेतील समतुल्य श्रेणीचे अधिकारी.

३) व्यवस्थापकीय संचालक या पदाचा कालावधी दोन वर्षाचा किंवा वयाची ६० वर्षे होईपर्यंत, यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीसाठी राहील.

४) व्यवस्थापकीय संचालक ह्या पदासाठीचे वेतन व भत्ते हे महामंडळाच्या निधीतून अदा करण्यात येईल.

५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ यांना पदावरुन दूर करण्याचे अधिकार आणि त्यांच्यावर शिस्तभंगविषयक कारवाई करण्याचे अधिकार शासनास असतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१८११०२१७३४२६६००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Mahadeo Jakate

Digitally signed by Kishor Mahadeo Jakate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=00b70645b34ddd8d92842418782eb54a6897ffe96f4da14db285f027cafa55d1, serialNumber=032a6acbfd529d66dd76e26eab14b28c6dd07d2f776e529b44ba2cb45324c503, cn=Kishor Mahadeo Jakate
Date: 2018.11.02 17:41:54 +05'30'

**( कि. म. जकाते )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३) सर्व मा.मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,

४) सर्व मा.विधान सभा सदस्य व विधान परिषद सदस्य

५) मा.मुख्य सचिव,

६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव ,

७) सर्व विभागीय आयुक्त,

८) सर्व जिल्हाधिकारी,

९) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

१०) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा/मूळ शाखा, मुंबई,

११) प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई

१२) आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई

१३) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय, मुंबई
१४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१५) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
१६) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
१७) अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र, मुंबई
१८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मेस्को), पुणे.
२०) एअर व्हाईस मार्शल श्री.एम.डब्ल्यू.देसाई, वित्तीय सल्लागार, गुंतवणूक समिती, सैनिक कल्याण विभाग, पुणे
२१) संचालक, सैनिक कल्याण विभाग, ‘रायगड’ राष्ट्रीय युध्द स्मारकासमोर, घोरपडी, पुणे,
२२) संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, सिडको, नवीन औरंगाबाद
२३) उप सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई,
२४) उप सचिव (सार्वजनिक उपक्रम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५) सर्व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, जिल्हा सैनिक कल्याण कार्यालये
२६) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख आणि कार्यालय प्रमुख
२७) सर्व मंत्रालयीन विभाग,
२८) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
२९) निवडनस्ती / कार्यासन-२८.